महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगावरील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/ मावक**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०००३२.
दिनांक :- १६ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.-रामाआ-२००३/प्र.क्र.१७५/मावक-१, दि.०१ मार्च, २००५.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग, क्र.सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/ मावक ५, दि.०२ डिसेंबर, २००६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.०६ सप्टेंबर, २०२४
४) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/ मावक, दि.२७ सप्टेंबर, २०२४.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३ मार्च, २०२५.
६) महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, मुंबई यांचे जा.क्र.राअजाजआ/मुं/आस्था/अस्थायी पदांना मुदतवाढ बाबत/२०२५/९७९ दि.२४.०३.२०२५.

**प्रस्तावना :-** अनुसूचित जाती जमातीच्या सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक, सांस्कृतिक व राजकीय सद्यस्थितीचा अभ्यास करून शासनास उपाययोजना सूचविण्यासाठी सामाजिक न्याय विभागाच्या वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगाची स्थापना करण्यात आली असून वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये आयोगाकरिता अधिकारी/कर्मचारी वर्गाची मंजूर संख्या ५३ पदांपैकी २७ पदे प्रथम टप्यात भरण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर २७ अस्थायी पदांना वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेली मुदतवाढ दि.२८.०२.२०२५ रोजी संपुष्टात आली आहे. यास्तव सदरहू २७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगाकरीता अधिकारी/कर्मचारी वर्गाची मंजूर ५३ पदांपैकी सोबतच्या विवरणपत्रात दर्शवलेली २७ पदे प्रथम टप्प्यात भरण्यास वाचा क्र.२ येथील दिनांक ०२ डिसेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर एकूण २७ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत पुढे चालू ठेवण्यास वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर मुदतवाढ दि. २८.०२.२०२५ रोजी संपुष्टात आली आहे.

२. वाचा क्र.५ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णय, दि.०३.०३.२०२५ अन्वये सदर अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यासाठी प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

३. महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगाच्या आस्थापनेवरील सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील २७ अस्थायी पदांना वाचा क्र.५ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार

दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. या पदांकरीता येणारा खर्च संबंधित आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतुदीमधून "मागणी क्रमांक एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, १४ अनुसूचित जातीला अनुदाने, ७८९- अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (१४) (०४) महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती आयोग (अ.जा.उ.यो) (कार्यक्रम) (२२२५जी३४१)" या लेखाशिर्षातंर्गत भागविण्यात यावा.

५. सदरहू निर्णय वाचा क्र.५ येथील शासन निर्णय, दि.०३.०३.२०२५ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२५०४१६१२५८५४५३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by VARSHA DESHMUKH
Date: 2025.04.16 13:00:13 +05'30'

**( वर्षा देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई -४०००१८.

२) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई- ४०००१८.

३) वरीष्ठ संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई- ४०००१८.

४) आयुक्त समाजकल्याण , महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता / लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७) निवासी व लेखा अधिकारी, मुंबई.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/पुणे.

९) उप सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१०)उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) निवड नस्ती/का.मावक

# विवरणपत्र

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक,
दिनांक :- १६ एप्रिल, २०२५.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या | वेतनश्रेणी (रूपये) |
|---|---|---|---|
| १. | सदस्य सचिव (सह सचिव दर्जा) | १ | (एस-२७) ११८५००-२१४१०० |
| २. | सह संचालक (उप सचिव दर्जा) | १ | (एस-२५) ७८८००-२०९२०० |
| ३. | अतिरिक्त पोलीस अधिक्षक | १ | (एस-२५) ७८८००-२०९२०० |
| ४. | वरीष्ठ संशोधन अधिकारी | १ | (एस-२३) ६७७००-२०८७०० |
| ५. | पोलिस निरिक्षक | २ | (एस-१८) ४९१००-१५५८०० |
| ६. | स्वीय सहाय्यक | १ | (एस-१६) ४४९००-१४२४०० |
| ७. | लघुलेखक उच्चश्रेणी | २ | (एस-१५) ४१८००-१३२३०० |
| ८. | सहाय्यक लेखा अधिकारी | १ | (एस-१५) ४१८००-१३२३०० |
| ९. | कार्यालयीन अधिक्षक | १ | (एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १०. | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ | (एस-१४) ३८६००-१२२८०० |
| ११. | सांख्यिकी अधिकारी | १ | (एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १२. | संशोधन सहाय्यक | २ | (एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १३. | सहाय्यक (विधी) | १ | (एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १४. | वरीष्ठ सहाय्यक | २ | (एस-८) २५५००-८११०० |
| १५. | लिपिक टंकलेखक | २ | (एस-६) १९९००-६३२०० |
| १६. | बिल लिपीक | १ | (एस-६) १९९००-६३२०० |
| १७. | वाहन चालक (कंत्राटी) | २ | ४०००/- |
| १८. | शिपाई | ४ | (एस-१) १५०००-४७६०० |
| | **एकूण पदे** | **२७** | ---- |

Digitally signed by VARSHA DESHMUKH
Date: 2025.04.16 13:01:00 +05'30'

**( वर्षा देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**